**सन २०१९-२० या आर्थिक वर्षात नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालय इमारत बांधण्याकरिता आकस्मिकता निधी उपलब्ध करुन देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीसीबी-१११९/प्र.क्र.९७/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय , मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०.

पहा :- १) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.सीसीबी-११९/प्र.क्र.९७/का.१३, दिनांक ०४.०२.२०२०
२) शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्र.आकनि-२०२०/प्र.क्र.०२/अर्थ-१२, दिनांक १३.०२.२०२०

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ च्या पत्रान्वये, नाशिक येथे ४४ कोर्ट हॉल असलेली नवीन जिल्हा न्यायालयीन इमारत (बेसमेंट + तळमजला + ७ मजले) बांधण्याकरिता रु.१,७१,१७,००,०००/- (रुपये एक अब्ज एक्काहत्तर कोटी सतरा लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालय इमारतीच्या बांधकामास सन २०१९-२० या आर्थिक वर्षात आकस्मिकता निधीतून अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

**नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालय इमारत बांधकामाकरिता रु.१,०००/- (रुपये एक हजार फक्त) इतकी रक्कम आकस्मिकता निधीतून शासनास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

२. या योजनेंतर्गत होणारा खर्च पुढे नमूद लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आकस्मिकता निधीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक एच-८,**
४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च,
०१, कार्यालयीन इमारती
०५१, बांधकाम,
(०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा)
(०३)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम),
**(४०५९०६७२)**
५३-मोठी बांधकामे
**आकस्मिकता निधी संकेतांक (८०००७६०९)**

३. या रक्कमेच्या देयकावर **आकस्मिकता निधी अग्रिम शासन ज्ञापन, वित्त विभाग, क्रमांक : आकनि-२०२०/प्र.क्र.२/अर्थ-१२, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२० अन्वये मंजूर** असे लाल शाईने लिहावे व ते लाल शाईने अधोरेखित करावे.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केला आहे, त्याच कारणासाठी वापर करत असल्याबाबत अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक यांनी खात्री करावी व त्या संदर्भातील अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाचा अनैपचारिक संदर्भ क्र.१४५/२०/व्यय-५, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२० अनुसार त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१४१२५६५७७०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.02.14 12:58:00 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सहसचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
४. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.अप्पर मुख्य सचिव, (वित्त), मंत्रालय, मुंबई.
६. मा.अप्पर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
७. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, नाशिक.
८. मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
१०. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक.
११. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
१२. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
१३. उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, नाशिक.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१५. वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६. नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१८. निवड नस्ती/संग्रहार्थ.